सहायक नगर रचनाकार (श्रेणी-१)(गट-ब) पदावर
नामनिर्देशनाने नियुक्ती व पदस्थापना...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - टिपीव्ही-१२१४/७१/प्र.क्र.९/नवि-२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांक:- २८ जानेवारी,२०१५

**संदर्भ :-** १) शासन पत्र, नगर विकास विभाग, क्रमांक-टिपीव्ही १२१२/१२१/प्र.क्र.३७/नवि-२७, दि.१८.७.२०१२
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र.११८३/२१३/१५,दि.२१.१.२०१४.
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २१.८.२०१४
४) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्रमांक आस्था/सनर श्रेणी-१/गट- ब/नानि/प्रशा-१/५७४६, दि.५.११.२०१४.

**शासन निर्णय**

नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयातील सहायक नगर रचनाकार (श्रेणी-१) (गट-ब) (वेतनश्रेणी रु.९३००-३४८००, ग्रेड वेतन रु.४४००) या संवर्गातील सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांवर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये नामनिर्देशनाने नियुक्तीकरीता १०० उमेदवारांची गुणवत्ताक्रमानुसार शिफारस केली. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सुचित केल्यानुसार आयोग पुरस्कृत उपरोक्त उमेदवाराने सादर केलेल्या कागदपत्रांची संचालक, नगर रचना, पुणे यांचेमार्फत छाननी करण्यात आली व त्यानंतर उपरोक्त क्र.३ येथील दि.२१.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये एकूण ९३ उमेदवारांना नियुक्ती व पदस्थापना देण्यात आल्या. उर्वरित ७ उमेदवारांपैकी, श्री. संदिप दगडू हासे व श्री. अभिजीत सिताराम डोळस यांची जातवैधता प्रमाणपत्रे प्राप्त न झाल्याने तसेच कु.स्नेहल चंद्रकांत यादव यांनी नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्र सादर न केल्याने त्यांना नियुक्त्या देण्यात आल्या नव्हत्या. कु.स्नेहल चंद्रकांत यादव यांनी नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्र सादर केले आहे. मात्र श्री.संदीप दगडू हासे व श्री.अभिजीत सिताराम डोळस यांनी जातवैधता प्रमाणपत्र अद्याप सादर केलेले नाही. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १२.१२.२०११ नुसार सदर उमेदवारांनी नियुक्तीनंतर ६ महिन्यांमध्ये जातवैधता प्रमाणपत्र सादर करण्याची मुभा असल्याने त्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ८.६.२०१० च्या -महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रीत व अराजपत्रीत) पदांवर सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप याबाबत नियमावली, २०१०॰ मधील तरतूदीनुसार सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने विभागीय संवर्ग वाटप करण्यात आले असून, सदर उमेदवारांना खालील अटींना अधीन राहून सरळसेवेने सहायक नगर रचनाकार (श्रेणी-१)(गट-ब) पदावर तात्पुत्ती नियुक्ती देऊन या शासन निर्णयाच्या परिच्छेद ३ मध्ये नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून पुढीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | गुणवत्ता क्र. | उमेदवाराचे नांव | नियुक्तीचा प्रवर्ग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | ३८ | श्री.हासे संदिप दगडू | इ.मा.व. | प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई. |
| २ | ६२ | श्री.डोळस अभिजीत सिताराम | अ.जा. | सहजिल्हा निबंधक वर्ग-१, पुणे (ग्रामीण). |
| ३ | ७६ | कु.यादव स्नेहल चंद्रकांत | इ.मा.व. | उप अभियंता,(अंमलबजावणी कक्ष) औरंगाबाद. |

२. शासन निर्णय, दि.२१.८.२०१४ अन्वये नियुक्ती व पदस्थापना देण्यात आलेल्या पुढील तक्त्यात नमूद उमेदवारांना त्यांच्या संबंधित पदस्थापनेच्या ठिकाणचे पद व्यपगत झालेले असल्याने, संचालक, नगर रचना, पुणे यांनी, त्यांचे कार्यालयीन आदेश, दि.५.११.२०१४ अन्वये, विभागीय संवर्ग वाटपानुसार त्यांना मंजूर विभागात केलेल्या सुधारीत पदस्थापनेसदेखील याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | सुधारीत पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|
| १ | श्री.नितीन मधुकर जाधव | सहायक संचालक, नगर रचना मुंबई शहर भूमापन व भूमिअभिलेख, मुंबई (रिक्त पदी) |
| २ | श्रीमती स्नेहा भागवत जामदार | सहायक संचालक, नगर रचना अलिबाग शाखा (रिक्त पदी) |

**३. अटी व शर्ती :-**

अ) सदर उमेदवारांची सहायक नगर रचनाकार या पदावरील नियुक्ती प्रथम दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी राहील. सदर परिवीक्षा कालावधी त्यांनी समाधानकारकरीत्या पूर्ण करणे आवश्यक राहील. तसेच सदर उमेदवारांची सेवाज्येष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गुणवत्ता यादीतील अनुक्रमानुसार राहील.

ब) सदर उमेदवारांची नियुक्ती तात्पुरती असून, सदर नियुक्ती त्यांचे पूर्वचारित्र्य व वर्तणूक यांच्या पडताळणी अहवालावर अवलंबून राहील. उपरोक्त उमेदवारांचा शासन सेवेत वैद्यकीय तपासणी व पोलिस अहवाल त्या-त्या कार्यालयाने यापूर्वीच घेतला असल्यास, त्यांची नव्याने तपासणी तसेच पोलिस अहवाल घेणे आवश्यक ठरणार नाही. तसेच सदर उमेदवारांनी जातवैधता प्रमाणपत्र सादर केले नसल्यास आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यात शासनास सादर करावे.

क) सदर उमेदवारांनी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.६१/ २००१/३९, दिनांक १९ मार्च, २००३ मधील तरतुदीनुसार संगणक हाताळणी/ वापराबाबत आवश्यक प्रमाणपत्र सादर केले नसल्यास एका महिन्याच्या कालावधीत संचालक, नगर रचना, पुणे यांचेकडे सादर करणे आवश्यक आहे.

ड) नामनिर्देशनाने नियुक्त उमेदवारांनी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक वशिअ-१२१४/ प्र.क्र.२६/११, दिनांक २ जून, २०१४ मधील तरतुदीनुसार, त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून दोन महिन्यांच्या कालावधीत त्यांची स्वत:ची मत्ता व दायित्वे याबद्दलची विवरणे विहित प्रपत्रांमध्ये नगररचना संचालनालयाकडे सादर करावीत. तसेच त्यानंतर प्रत्येक वर्षी त्या-त्या वर्षीच्या ३१ मार्चच्या स्थितीस अनुसरुन अशी मत्ता व दायित्वे यांचे विवरणपत्र त्या वर्षाच्या ३१ मे पर्यंत संचालनालयासाठी सादर करावीत.

इ) उपरोक्त उमेदवारांपैकी ज्यांना शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०००/प्र.क्र.१७/२०००/१२,दिनांक १.७.२००५नुसार दि.२८.३.२००६ व तद्नंतर दोनपेक्षा अधिक मुले असल्याचे निदर्शनास येईल, असे उमेदवार शासकीय नोकरीस अपात्र ठरतील व त्यांच्या सेवा आपोआप संपुष्टात येईल.

ई) उपरोक्त नमूद उमेदवार हे शालान्त प्रमाणपत्र परीक्षेमध्ये हिंदी/मराठी हे विषय घेऊन उत्तीर्ण झाले नसल्यास त्यांना एतदर्थ मंडळाच्या हिंदी/ मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

फ) उपरोक्त नमूदपैकी संचालनालयाच्या आस्थापनेवरील ज्या उमेदवारांना शासकीय सेवेतून सेवामुक्त व्हावयाचे असेल, त्यांनी याबाबत किमान एक महिन्याची पूर्वसूचना देणे आवश्यक आहे. मात्र त्यांच्या सेवेचा राजीनामा सक्षम अधिकाऱ्यांनी स्वीकारला तरच त्यांना कार्यमुक्त होता येईल. तसेच पूर्वसूचनेचा काळ संपण्यापूर्वी राजीनामा स्वीकारुन कार्यमुक्त व्हावयाचे असेल तर शासन नियमाप्रमाणे एक महिन्याचे मूळ वेतन व भत्ते याप्रमाणे येणारी रक्कम त्यांना शासनाकडे रोख भरावी लागेल. मात्र सेवेचा राजीनामा स्वीकारण्याचे अथवा न स्वीकारण्याचे अधिकार सक्षम अधिकाऱ्यांना राहतील. तसेच राजीनाम्याबाबतच्या पूर्वसूचनेच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा व इतर सवलती त्यांना मिळणार नाहीत.

४. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी संबंधीत उमेदवारांचे नियुक्तीचे कार्यकारी आदेश तात्काळ निर्गमित करावेत. तसेच सदर उमेदवारांनी नियुक्तीच्या पदाचा कार्यभार कधी स्वीकारला याबाबत शासनास अवगत करावे. तसेच सदर शासन निर्णयाची प्रत संचालनालयाच्या कार्यालयीन आदेशाच्या प्रतीसह संबंधीत उमेदवारांना ई-मेलद्वारे पाठविण्यात यावी.

**५.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०१५०१२८१७१६२२०६२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.01.28 17:27:04 +05'30'

**(दि.सि.अणेराव)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे, खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
३) मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
४) मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
६) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती)
७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (पत्राने)
८) संचालक, तथा सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९) सह संचालक, नगर रचना, सर्व विभागीय कार्यालये,
१०) उप सचिव (नवि-२७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
११) उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सहायक संचालक, नगर रचना, शाखा कार्यालये (सर्व)
१३) प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई.
१४) सह जिल्हा निबंधक (वर्ग-१) पुणे ग्रामीण
१५) उपअभियंता, अंमलबजावणी कक्ष, औरंगाबाद
१६) सहायक संचालक, नगर रचना, मुंबई शहर भुमापन व भुमिअभिलेख, मुंबई.
१७) सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग शाखा, अलिबाग.
१८) सर्व संबंधित सहायक नगर रचनाकार ( संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे,यांच्यामार्फत)
१९) निवड नस्ती , (नवि-२७).